**तालुका बीज गुणन केंद्रांच्या जमीनी कृषक अथवा**
**अकृषक कामासाठी संस्थेस न देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
शासन परिपत्रक क्रमांकः ताबिके २०११/प्र.क्र. ४३/१ अे
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
**दिनांकः ८ सप्टेंबर , २०११.**

**वाचा :-** शासन समक्रमांक दिनांक १६/४/२०१० चे पत्र.

## परिपत्रक

महाराष्ट्र राज्यात एकूण १९४ तालुका बिज गुणन केंद्रे आणि २३१ कृषि चिकित्सालये स्थापन करण्यात आलेली आहेत. तालुका बिज गुणन केंद्रांचा मुख्य उद्देश केंद्रांवर बिजोत्पादन कार्यक्रम घेऊन नव-नवीन वाणाचे बियाणे उत्पादित करुन ते शेतक-यांना उपलब्ध करुन देणे हा आहे. तालुका बिज गुणन केंद्रांवर कृषि चिकित्सालयेसुध्दा स्थापित करण्यात आलेली असून, त्यावर शेतकरी प्रशिक्षणे, पिक प्रात्याक्षिकाद्वारे विकसित तंत्रज्ञान शेतक-यांपर्यंत पोहोचविणे, तसेच कृषि व सल्ला या बाबींतर्गत शेतक-यांना शेतावरील माती परिक्षण किड रोग निदान इत्यादीकरीता सेवा पुरविण्यात येत आहेत.

२. तालुका बिज गुणन प्रक्षेत्राच्या जमिनी या बिजोत्पादन कार्यक्रम घेण्यासाठी शेतक-यांना योग्य तो मोबदला देवून संपादित करण्यात आलेल्या आहेत. तालुका बिज गुणन प्रक्षेत्राकरीता संपादित करण्यात आलेल्या प्रक्षेत्राच्या जमीनी आता शहराजवळ आल्याने विविध संस्थांमार्फत प्रक्षेत्राच्या जमिनीची मागणी मोठया प्रमाणावर होत आहे. आतापर्यंत सुमारे १२५ प्रक्षेत्राच्या ८०० हेक्टर क्षेत्राची विविध संस्थांमार्फत मागणी झालेली आहे. त्यापैकी काही जमीनी हया विविध संस्थांना शासन मान्यतेने हस्तांतरित करण्यात आलेल्या आहेत.

३. शासनामार्फत तालुका बिज गुणन केंद्रांकरीता ज्या प्रयोजनासाठी शेतक-यांकडून जमीनी संपादित करण्यात आलेल्या आहेत, त्याच प्रयोजनासाठी त्या जमीनींचा वापर होणे आवश्यक आहे. त्यामुळे तालुका बिज गुणन केंद्रांसाठी अधिगृहित करण्यात आलेल्या कृषक अथवा अकृषक कामासाठी कोणत्याही संस्थेला हस्तांतरित करण्यात येऊ नयेत, असे शासनाचे सर्वसाधारण धोरण आहे. त्यानुषंगाने तालुका बिज गुणन केंद्रे फळ रोपवाटिका व कृषि चिकित्सालये यांच्या जमीनीच्या मागणीसाठी शासकीय विभाग/स्वायत्त संस्था/ अशासकीय खाजगी संस्था/व्यक्ती यांचेमार्फत प्राप्त होणारे कोणतेही प्रस्ताव स्वीकारण्यात येऊ नयेत व त्याची शिफारस शासनास करण्यात येऊ नये अशा सूचना संदर्भातील पत्रान्वये

देण्यात आलेल्या आहेत.  तथापि, तरीसुध्दा शासकीय जमिनींची मागणी विविध स्तरावरुन करण्यात येत असून तसे प्रस्ताव शासनास प्राप्त होत आहेत.

४.  तालुका बिज गुणन केंद्रांवरील बिजोत्पादन कार्यक्रम वाढवून शेतक-यांना चांगल्या प्रतीचे बियाणे उपलब्ध करुन देणे, तसेच स्थापित कृषि चिकित्सालयावर शेतक-यांपर्यंत प्रगत कृषि तंत्रज्ञानाचा प्रचार व प्रसार परिणामकारकरित्या करणे व विकसित तंत्रज्ञान जलद गतीने पोहोचविणे ही बाब विचारात घेऊन तालुका बिज गुणन केंद्रांवरील व कृषि चिकित्सालयाच्या शासकीय जमीनी खाजगी अथवा इतर कोणत्याही संस्थेस यापुढे कृषक अथवा अकृषक प्रयोजनासाठी न देण्याचा शासनाने धोरणात्मक निर्णय घेतला असून, कोणत्याही संस्थेचा जमीनीच्या मागणीचा प्रस्ताव यापुढे शासनाकडे पाठवू नये, अशा सूचना पुन्हा देण्यात येत आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.  तसेच कोणत्याही विभागाने यापुढे कृषि विभागाच्या अखत्यारितील तालुका बीज गुणन केंद्रांच्या जागा परस्पर हस्तांतर करण्याबाबतचे आदेश निर्गमित करु नयेत.

५.  सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर (www maharashtra gov in) उपलब्ध करण्यात आालेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक  २०११०९०८१६१३३३००१  असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**सही / -**

**( सुनिल हंजे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्री  यांचे सचिव,
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय  कृषि सहसंचालक,
सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी,
सर्व जिल्हापरिषदेचे कृषि विकास अधिकारी,

सर्व जिल्हाधिकारी,
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग,
मंत्रालय,मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
निवडनस्ती.